कारागृह महानिरीक्षक कार्यालयासाठी आज्ञावल्या
विकसित करण्याकरिता संगणक खरेदी साठी
निधी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र.एमएजे ०१२१/५(६४)/पीआरएस-२,**

**मंत्रालय,मुंबई, ४०० ०३२,**

**दिनांक : १ फेब्रुवारी, २००२.**

**पहा:-१)कारागृह महानिरीक्षक,म.रा.पुणे यांचे पत्र क्र.संगणकीकरण/१९९८/**
**क,३/कक्ष १(५) दिनांक २५.५.२००१**

**२) सा.प्र.वि.शा.नि.क्र.सीओएम १०९९/प्र.क्र.२८७/९९/३९/**
**दिनांक १५.११.२००१.**

**३) वित्त विभाग,शा.नि.क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम,**
**दिनांक ११.७.२००१.**

**<u>शासन निर्णय</u> :-** कारागृह महानिरीक्षक यांचे कार्यालय,पुणे यांना २ संगणक संच खरेदी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या .शा.नि.क्र.सीओएम १०९९/प्र.क्र.२८७/९९/३९/ दिनांक १५.११.२००१ अन्वये मंजूरी देण्यात आली आहे.

२. दोन संगणक संच खरेदी करण्यासाठी रु.७७,०००/-(रु.सत्त्याहत्तर हजार फक्त) इतका निधी सामान्य प्रशासन विभागामार्फत कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या कार्यालयास उपलब्ध करण्यासाठी गृह विभागाकडे अभिहस्तांकित करण्यात आला आहे. कारागृह महानिरीक्षक कार्यालय,पुणे यांच्या कार्यालयासाठी खरेदी करण्यात येणारा संगणक **( Built in modcom)** चे असावेत. त्याची खरेदी दरकरारानुसार करण्यात यावी.

३. सामान्य प्रशासन विभागाने संगणक खरेदी करण्यासाठी उपलब्ध केलेला निधी खर्च करतेवेळी वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८,भाग पहिला उपविभाग दोन व

शा.नि.वि.वि.क्र. विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१ मधील अ.क्र.२८अ नियम क्र.७६ व विवरणपत्रातील रकाना तीनच्या अधीन राहून व रकाना क्र. सहा मधील अटींचे तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या संबंधित नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे..

४. सदरहू प्रयोजनासाठी होणारा खर्च हा सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली येणारे माहिती तंत्रज्ञान संचालनालयास नेमून दिलेले लेखाशीर्ष " मागणी क्र.ए ५,२०५२ सेक्रेटरीएट, सर्वसाधारण सेवा,(०९०) सेक्रेटरीएट (९) माहिती तंत्रज्ञान संचालनालय (३२) यंत्र सामुग्री व साधनसामुग्री योजनांतर्गत (२०५२०४८२)" या खाली खर्ची टाकण्यात यावा. व तो वित्तिय वर्ष सन २००१-२००२ साठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरहू खरेदी ३१ मार्च २००२ पूर्वी करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सु. म. माने )
**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
**१) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य,१ मुंबई,**
**२) महालेखापाल(लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,१ मुंबई**
**३) कोषागार अधिकारी,पुणे.**
**४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.**
**५) वित्त विभाग( व्यय-४) मंत्रालय,मुंबई, ४०० ०३२,**
**६) नियोजन विभाग (कार्यासन-१४५३),**
**७) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य, पुणे**
**९) माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, सा.प्र.वि.,मंत्रालय,मुंबई, ४०० ०३२.**
**१०) निवडनस्ती.**

( सोबत मा. अपर मुख्य सचिव ( गृह ) यांच्या अध्यक्षतेखाली पूणे येथे दिनांक १५.५.९७ रोजी वरिष्ठ तुरुंग अधिकाऱ्यांची बैठक आयोजित करण्यात आली होती. सदरहू बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या महाराष्ट्र कारागृहे कैदयांना देण्यात येणाऱ्या सवलती )

( नियम -४ उपनियम -२ मधील नियमात सुधारणा करण्याबाबतच्या अधिसुचनांच्या प्रती ( मराठी व इंग्रजी ) माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सोबत जोडली आहे. )

**********

क्रमांक:एमआयएस ०११७/१०(७५)/पीआरएस-२,
गृह विभाग,मंत्रालय,मुंबई, ४०० ०३२.
दिनांक : ६ फेब्रुवारी, २००२.

व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नी रोड मुंबई यांना विनंती करण्यात येत आहे की सोबत जोडलेल्या मराठी व इंग्रजी २ अधिसूचना महाराष्ट्र राजपत्र भाग-१ (अ) मध्ये प्रकाशित करुन सदरहू अधिसूचनांच्या प्रत्येकी १० प्रती या विभागाकडे पाठविण्यात याव्यात ह्या विनंतीसह अग्रेषित.

( सु. म. माने )
कक्ष अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

*************

क्रमांक : एमव्हीजे ०११७/१०(७५)/पीआरएस-२,
गृह विभाग,मंत्रालय,मुंबई, ४०० ०३२.
दिनांक : ६ फेब्रुवारी, २००२.

प्रति,
अधिसूचनांच्या प्रतिसह माहितीसाठी सादर अग्रेषित,
पोलीस महासंचालक, पोलीस महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व जिल्हादंडाधिकारी,अहमदनगर
सर्व पोलीस अधिक्षक,
सर्व कारागृह अधीक्षक,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवडनस्ती.